**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत "वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण" प्रकल्प सन २०२१-२२ व २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी रू. १००.०० कोटी रक्कमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवि-२०२१/प्र.क्र.१४७/९-अे**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ४ ऑक्टोंबर, २०२१**

**संदर्भ**:-१.राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २९ व्या बैठकीचे इतिवृत्त-शासन पत्र जाक्र. NO. RKV -०१२०/C.R.१४/१४A, Date-०५/०७/२०२१

२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे जा.क्र. मराफऔवमं/वै.शे.प्र.मं./२५४१३/२०२१, दि.०५/०८/२०२१ चे पत्र.

३. प्रकल्प व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे जा.क्र. मराफऔवमं/वै.शे.प्र.मा./२७९०९/२०२१, दि.२६/०८/२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील २९ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीमध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत **वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण प्रकल्प** सन २०२१-२२ व २०२२-२३ मध्ये राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रकल्पांतर्गत एकूण रू.२००.०० कोटीचा कार्यक्रम दोन वर्षाच्या कालावधीत राबविण्यात येणार असून राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्याच्या स्वरूपात रू. १००.०० कोटी निधी उपलब्ध करून दिला जाणार आहे. त्यानुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने सन २०२१-२२ व २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी रू. १००.०० कोटी नियतवाटप मंजूर केलेले आहे.

सन २०२१-२२ व २०२२-२३ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण प्रकल्प राबविण्यास रू. १००.०० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२१-२२ व २०२२-२३ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत "**वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण प्रकल्प**" राज्यात राबविण्यास रू. १००.०० कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्प ५०:५० या प्रमाणात राबविण्यात येणार आहे. त्यानुसार वैयक्तिक लाभार्थ्यांना एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाच्या मापदंडानुसार अनुदान उपलब्ध करून देण्यासाठी रू. १००.०० कोटी निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्प २ वर्ष कालावधीत राबवावयाचा असून चालू वर्षासाठी रू. १००.०० कोटी निधीचे नियतवाटप (allocation) मंजूर करण्यात येत आहे. तथापि, शेतकऱ्यांकडून प्राप्त होणाऱ्या मागणीच्या प्रमाणात वर्ष निहाय उपलब्ध करून द्यावयाच्या नियतवाटपात वाढ/घट करण्याचे अधिकार शासनास राहतील.

३. सदर प्रकल्प एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात राबविण्यात येईल.

४. मंजूर निधीपैकी केंद्र शासनाचा हिस्सा ६० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के राहील.

५. राज्यास प्राप्त होणाऱ्या एकूण आर्थिक लक्षांकाचे राज्यातील सर्व जिल्ह्यांना/तालुक्यांना समन्यायी प्रमाणात वाटप करावायचे असून सदर आर्थिक लक्षांकाच्या मर्यादेत शेतकऱ्यांची निवड करण्याची मुभा राहील.

६. विभागाच्या महाडिबीटी प्रणालीमार्फत लाभार्थ्यांचे अर्ज ऑनलाईन मागवून घ्यावेत. प्रकल्पातंर्गत लाभार्थ्यांची निवड सोडत पध्दतीने करण्यात यावी.

७. निवडलेल्या लाभार्थ्यांना सक्षम प्राधिकारी यांनी पूर्व संमती द्यावी. काम पुर्ण झालेल्या कामाची अधिकृत अधिकाऱ्यामार्फत मोका तपासणी करण्यात यावी. नंतरच वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण प्रकल्पाकरिता अनुदान अनुज्ञेय राहील.

८. लाभार्थ्याने वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण केल्यानंतर त्याबाबतच्या नोंदी जिओ-टॅगींग द्वारे करण्यात याव्यात.

९. लाभार्थ्याच्या ७/१२ उताऱ्यावर नोंद घेतल्याशिवाय अनुदान अदा करुन नये.

१०.या प्रकल्पांतर्गत अनुसुचित जाती, अनूसूचित जमाती, महिला लाभार्थी, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकरी यांना मार्गदर्शक सूचनांनुसार विहित प्रमाणात प्राधान्याने अर्थसहाय्य उपलब्ध करून द्यावे.

११.प्रस्तुत प्रकल्प राबविण्याकरिता निधी वितरणाची कार्यवाही राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.

१२.प्रकल्पाची अंमलबजावणी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे सनियंत्रणाखाली कृषि विभागामार्फत करण्यात यावी.

१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घ्यावी.

१४. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत, वैयक्तिक शेततळे अस्तरीकरण या प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट जमा करण्यात यावा. सदर निधी अखर्चित राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी काळजी घ्यावी.

१५.योजनेतील निधी खर्चाचे लेखा परिक्षित उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यास वेळोवेळी सादर करावी.

१६.सदर शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण आणि खर्चात अनियमितता होणार नाही यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharrashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११००४१५१५३२२५०१ असा आहे. हा ओदश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.10.04 15:17:14 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
४) मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
५) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
६) मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा. सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
१०) सर्व संचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
११) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य,
१२) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१३) सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१५) संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
१६) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२०) लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
२१) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२२) निवड नस्ती